# गुजगोष्टी



लेखन/चित्रे: पामेला झागरेन्स्की
मराठी: तृप्ती कर्णिक

एक छोटी मुलगी असते. तिला गोष्टी वाचायचं वेड असतं. त्यातील शब्द आणि चित्रांबरोबर नवीन आणि अनोख्या विश्वाची सफर करायला तिला खूप आवडायची. त्यातील पात्रं तिचे सवंगडी बनायचे आणि मग अनेक दिवस ती त्यांच्या प्रेमात बुडालेली असायची.

एक दिवशी शाळा सुटायची वाट पाहत असताना तिचं वरच्या कप्प्याकडे लक्ष गेले. तिथे एकच पुस्तक ठेवले होते.

“ते कुठलं पुस्तक आहे, ताई?” तिनं शिक्षिकेला विचारलं.

“ते जादुई गोष्टींचं पुस्तक आहे. मी जेव्हा तुझ्याएवढी होते ना तेव्हा माझ्या आजीने ते मला भेट दिलं होतं,” ताई म्हणाल्या. “तुला आज रात्री वाचायला घेऊन जायचं आहे का?”





हो ताई, मला खूप आवडेल,” छोटी मुलगी खुशीत म्हणाली.




तीनचे टोले वाजले. शाळा सुटली. ताईनी तिला कपाटातून पुस्तक काढून दिले. ती पळतच घरी पोचली.





घरी आल्यावर तिने कुत्र्याला गोंजारलं आणि भरपूर खाऊन घेतलं. तिची उत्सुकता शिगेला पोचली होती. पुस्तक घेऊन ती लगबगीने आपल्या खोलीत गेली.

त्या छोट्या मुलीने पुस्तक उघडलं आणि एकेक पान उलटू लागली. प्रत्येक चित्र तिला आधीच्या चित्रापेक्षा सुंदर आणि उत्सुकता वाढवणारं वाटत होतं. ती शेवटच्या पानावर आली तेव्हा डोळ्यात दाटलेल्या आनंदाश्रूमुळे काहीही दिसत नव्हत.

अरे! पण शब्द कुठे आहेत? गोष्टो कुठे आहेत?

एकही अक्षर नसलेलं हे कसं बर गोष्टीचं पुस्तक आहे, ती विचारात पडली.

ती छोटी मुलगी ते शब्द नसलेलं पुस्तक चाळत असताना अचानक वारा सळसळला. आणि कुणीतरी तिच्या कानात हळूवार आवाजात बोललं.

*“निराश नको होऊस, चिमुकले.*
*तुला नक्की शब्द सुचतील.*
*तुला काल्पनिक गोष्टी लिहिता येतील.*
*काही सोप्या शब्दाने सुरुवात कर आणि तिथून तुला आपोआप सुचू लागेल बघ.*
*लक्षात ठेव: गोष्टीची सुरुवात, मध्य, शेवट हवा तेव्हा बदलता येईल आणि हवा तसा नवनवीन कल्पनेने रंगवता येईल.*
*कल्पनेच्या विश्वात कुठले नियम नसतात किंवा चूक बरोबर असं काही नसतं.”*

तो आवाज तिला इतका आश्वासक वाटला कि त्या छोट्या मुलीने पहिलं पान उघडली आणि लगेच सुरुवातही केली.



सुरुवातीला तिला काही सुचेना. म्हणून तिने चित्राकडे अजून बारकाईनं पाहिलं. ह्या अस्वलांची फारच घट्ट मैत्री दिसतेय. त्यांना खूप मध आवडते ना त्यामुळे बहुधा ते निळं अस्वलं भेट म्हणून मध घेऊन येतंय..

**"निळू अस्वलाची सहल"** – हे शीर्षक मस्त वाटतंय. गोष्ट सुरु झाली. ती स्वतःशीच बोलू लागली*: निळू अस्वल वसंताच्या पहिल्या दिवशीच आलं. ते म्हणालं....."*



छोटी मुलगी दुसऱ्या चित्राचं निरीक्षण करू लागली. अरे, तो पिटुकला उंदीर इथेही आहे की. तो माणूस त्या डौलदार बैलाला काय बरं सांगत असावा? मला कळले...

**"गुपित"** "बैलदादा, हे तू कुणालाच सांगणार नाही ह्याचं वचन ते बघू आधी मला. आम्हाला तुझी मदत हवी आहे. मागच्या आठवड्यात......"



आता त्या छोट्या मुलीला भरभर सुचू लागलं. शब्द वाक्यांमध्ये तर वाक्यं गुंफून गोष्टी तयार होऊ लागल्या,

**"शोध"** एका मोठ्या लाकडी होडीमध्ये त्यांची शेकडो मैलांची सफर सुरु झाली. "आपण पोचलो का?" सश्याने विचारलं. "अजून एक रात्र आणि दोन दिवस," सिंह म्हणाला. "अरे बापरे! खूपच मोठा प्रवास आहे. आपण नक्की कुठे चाललो आहोत?" सश्याने विचारलं.

**"वाघाची प्रार्थना"**आजूबाजूचे सगळे प्राणी आज इकडे गोळा होणार आहेत. जोरदार तयारी चालू होती. टोकदार टोपी घातलेला विदुषक एकार्डीयन वाजवणार आहे.

युनिकोर्न तारेच्या कड्यातून उड्या मारणार आहे. बरोबर बाराच्या ठोक्याला सगळ्यांना चहा देण्यात येईल. त्यानंतर वाघ काही महत्वाचं सांगणार आहे.....



"**<u>वाढदिवसाची पार्टी</u>**" सांगितल्याप्रमाणे आम्ही बरोबर ३:३३ वाजता पोचलो. चारपाती गवत आणि एक मोठा गरम माठ जंगलातल्या दारात मुद्दामहून ठेवला होता. डावीकडे बसलेल्या घुबडाने आम्हाला विचारलं, "पाहुणे कोण?" लगेच आम्ही त्याला सिक्रेट पासवर्ड सांगितला. आम्हाला वाढदिवसाचा केक घेऊन यायला सांगितलं होतं. त्या व्हॅनिला केकवर भरपूर आयसिंग आणि ब्लू रासबेरीमधे खोचलेल्या सहा मेणबत्त्या होत्या. पॅम आता काय घोषणा करणार होता हे कुणालाही माहित नव्हतं पण वाढदिवसाची शानदार पार्टी...

"**जादूचा अंगरखा**" एका रात्री रेशमी अंगरखा घातलेला एक गूढ माणूस नावेत बसून आमच्या किनाऱ्यावर आला. त्याला पाहताक्षणी तो जादुगार आहे हे आम्हाला कळलं. तो तोंडाने वेगवेगळ्या आकाराचे फुगे काढत होता. आणि कमाल म्हणजे नंतर नंतर त्या फुग्याचा आकार जिवंत होऊ लागला. आमच्या शांत किनाऱ्यावर एक अजस्त्र व्हेल शार्क आला. त्याला पाहून आम्ही थक्क झालो. आता आम्हाला काहीतरी करणं भाग होतं........





"**<u>सोनेरी चावी</u>**" आज भल्या पहाटे घुबड आम्हाला सांगून गेलं कि मध्यरात्री ते आम्हाला घ्यायला येईल. आम्हाला वेळेत तयार राहायला हवं तसेच कुठल्याही प्रसंगाला सामोरं जाण्याची तयारी हवी.

घुबड चोचीत सोन्याची चावी घेऊन आलं. आम्ही शांत आकाशाकडे झेप घेतली. पुढे काय होईल ह्याची.......

एकेक शब्द-वाक्य जोडत ती मुलगी तासनतास कल्पकतेने गोष्टी रचत बसली होती. चंद्र जेव्हा माथ्यावर आला तेव्हा तिला अनावर झोप आली. त्या गोष्टी आणि गोष्टीतली पात्रं ह्यांची स्वप्न पाहत ती झोपी गेली.



सकाळी जेव्हा तिला जाग आली तेव्हा तिच्या मनात त्या कुजबुजत्या वाऱ्याबद्दल कृतज्ञता दाटून आली. तिला बैल, घुबड, सिंह ह्या नवीन मित्रांची खूप आठवण आली. तिने परत पुस्तक उघडलं खरं पण तेव्हढ्यात क्षितीजाकडे सूर्य उगवला आणि पक्षी किलबिलाट करत लगबग करू लागले. शाळेला उशीर झालेला तिला अजिबात चालत नसे. तिने घाईघाईने आटोपलं, पुस्तकं हातात घेतलं आणि दारातून धावत सुटली.



वाटेत तिला एक कोल्हा भेटला. त्याच्या हातात गोल गाठोडं होतं.

“ए गोड मुलगी,माझ्याकडे तुझ्या पुस्तकासाठी काही शब्द आहेत. ते इकडे तिकडे वाऱ्यावर उडत होते. आणि मी किनई हुशार असल्याने त्यांना पकडून ह्या गाठोड्यात बांधलं आहे.

“व्वा, किती छान!”, मुलगी म्हणाली. ती खरं तर त्याचं ऐकून थोडी गोंधळली होती.

“जायच्या आधी मला थोडी मदत करशील का?” कोल्ह्याने विचारलं.

“हो, सांग ना. मला नक्की आवडेल,” मुलीने उत्तर दिले.

कोल्ह्याने मुलीचे आभार मानले. मुलीनेही कोल्ह्याचे आभार मानले आणि पुस्तकं व ते शब्दांचं गाठोडं घेऊन ती ती पळत पळत शाळेच्या दिशेने निघाली.

“सॉरी ताई. थोडा उशीर झाला,” धापा टाकत ती छोटी मुलगी म्हणाली.

“वाऱ्याने मला कानात काहीतरी सांगितलं आणि प्रत्येक चित्राची गोष्ट मला आली. मग मी खूप झोपले...आणि शब्द...ते कसे आणि केव्हा विखुरले गेले हे मला कळलंच नाही. पण त्या हुशार कोल्ह्याने त्यांना बरोबर जाळीत पकडलं आणि.......पण मला हे पुस्तक प्रचंड आवडलं आणि आणि मी विसरूनच गेले...थँक्यू! मला तुम्हाला खूप साऱ्या गोष्टी सांगायच्या आहेत.”

“मला तर त्या कधी एकदा ऐकते असं झालं आहे,” गोड हसत ताई म्हणाल्या.



## कोल्हा आणि द्राक्षे

भुकेल्या कोल्हयाला द्राक्षाच्या वेलीवर घोस लटकलेले दिसले. त्याने द्राक्षं मिळवण्यासाठी खूप प्रयत्न केले. ~~पण छे! त्याला काही केल्या ती मिळेना. तो निराश झाला आणि म्हणाला,"द्राक्षं आंबट आहेत."~~

**पण हा कोल्हा तर फारच हुशार होता. म्हणून तिने गोष्टीचा शेवट वेगळा केला.**

***आणि द्राक्षं फारच गोड लागली.***